मालेगाव पंचायत समिती जि. नाशिक प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१६/प्र.क्र. २३५/पंरा-७
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: ३१ मार्च, २०१७

वाचा :-

१) शासन निर्णय क्र.पंसई-२०१३/प्र.क्र.२१६/पंरा-७, दि.०४.०३.२०१३
२) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांचे पत्र क्र. जिपना/ बांखा/ इवद-२/पीबी/२७३/१६ दि.१९.०९.२०१६ व क्र.जिपना/ बांखा/ इवद-२/ पीबी/३२२/१६ दि.०८.१२.२०१६

प्रस्तावना :-

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी वरील संदर्भीय पत्रान्वये मालेगाव पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

२. मालेगाव पंचायत समिती जि. नाशिक प्रशासकीय इमारत बांधकामास दिनांक ०४.०३.२०१३ च्या शासन निर्णयान्वये रु. ३४५.७० लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. मालेगाव पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकाम जवळपास पुर्ण झाले असून त्या ठिकाणी दैनंदीन कामकाज सुरु करण्याच्या दृष्टीने फर्निचरची नितांत आवश्यकता आहे. मालेगाव पंचायत समिती करीता प्रशासकीय इमारतीचे बांधकाम मंजूर करते वेळी त्यामध्ये प्रस्तावित फर्निचरची बाब अंतर्भूत करण्यात आलेली नव्हती. त्यामुळे, अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी दि. ०८.१२.२०१६ च्या पत्रान्वये मालेगाव पंचायत समिती जि. नाशिक प्रशासकीय इमारतीच्या अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामांकरीता रु. ९६.७४ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रकास अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ नाशिक यांची तांत्रिक मान्यता घेण्यात आली आहे. या कामाकरीता सन २०१५-१६ ची दरसूची विचारात घेण्यात आली आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी प्रस्तावासोबत प्रस्तावित कामाचे बाब निहाय नकाशे व सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे.

३. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, मालेगाव पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या कामास प्रशासकीय मान्यता देण्याच्या रुपये ९६.७४ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

४. मालेगाव (जि. नाशिक ) पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या एकूण रक्कम रुपये ९६,७४,०००/-(अक्षरी रु. शह्याण्णऊ लक्ष चौऱ्याहत्तर हजार फक्त ) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामास पुढील अटींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) मालेगाव पंचायत समितीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेचे काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

५. मालेगाव पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी अंतर्गत फर्निचर सुविधेच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे:-

| FINAL GENERAL ABSTRACT FOR MALEGAO P.S. BLDG., INTERNAL FURNITURE WORK | | |
|---|---|---|
| Sr. No | Description of item | Amount (in Rs.) |
| 1 | Estimated Cost for Ground Floor Furniture | 3116348.39 |
| 2 | Estimated Cost for First Floor Furniture | 2851502.37 |
| 3 | Estimated Cost for Second Floor Furniture | 2555075.84 |
| | Total Estimated Cost for Interior & Furniture work | 8522926.60 |
| 4 | Architectural Fees @ 6 % on Total Cost | 511375.60 |
| 5 | Contingency @ 5 % on Total Cost | 426146.33 |
| 6 | Boards & Letterings @ 2.5 % on Total Cost | 213073.17 |
| | Total | 9673521.74 |
| | Says Rs. | 9674000.00 |

६. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. यावरील खर्च " २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३३११८०९२५६४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2017.04.05 18:19:17 +05'30'

( दि.बा पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, मध्यवर्ती इमारत, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
५) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
६) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
७) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नाशिक
८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नाशिक
९) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नाशिक विभाग, नाशिक
११) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक
१२) सभापती, पंचायत समिती, मालेगाव, जिल्हा नाशिक
१३) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मालेगाव, जिल्हा नाशिक
१४) निवडनस्ती-पं.रा.७